# महाराष्ट्र शासन

जलदगती डाकेद्वारे
(By Speed Post)

**क्रमांक:** मोसाअ-१००९(७)/(प्र.क्र.३९/०९)पाच,
विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक :** २१ नोव्हेंबर, २००९

**प्रति,**

अपर प्रबंधक,
उच्च न्यायालय (अ.शा./मू.शा.),
मुंबई.

**विषय :- सन २००९-२०१० या वित्तीय वर्षात मोटार वाहने खरेदी करण्यासाठी अग्रिम धन प्रमाणित करणेबाबत.**

**महोदय,**

विषयांकित प्रकरणी आदेशावरुन मा.मुख्य न्यायमूर्तींच्या माहितीकरिता आपणांस कळविण्यात येते की, सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या **५१** अर्जदारांना त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे **एकूण रुपये २१,०३,१०८/- (एकूण रुपये एकवीस लाख तीन हजार एकशे आठ फक्त)** इतकी रक्कम मोटार वाहने खरेदी करण्यासाठी अग्रिम म्हणून मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १३६, १३७ व १३९ च्या अधिन राहून २००९-२०१० या वित्तीय वर्षाकरिता अर्जदाराच्या संबंधित कार्यालय प्रमुख/मंजुरी अधिकारी यांनी केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येत आहे.

२. अर्जदारांनी मोटार वाहने खरेदी केल्यास त्यांच्या कार्यक्षमतेत वाढ होईल याची खात्री झाल्यांनतरच अग्रिम मंजूर करण्यात यावे.

३. याव्दारे प्रमाणित केलेले अग्रिम शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रिम-१०९९/प्र.क्र.३/९९/विनियम, दिनांक ९/७/१९९९ व क्रमांक अग्रिम-२००५/प्र.क्र.१८/२००५/विनियम, दि.२० जून, २००५ मधील तरतूदींच्या व अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात यावे.

a) वाहनाच्या मॉडेलचे नाव, उत्पादनाचे वर्ष, खरेदीची तारीख व खरेदी पावती/बील व नोंदणीचे कागदपत्र सादर करण्यात यावेत.

b) नवीन मोटार कार/मोटार सायकल/स्कूटर/मोपेडचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील याची दक्षता घ्यावी.

c) नवीन मोटार कार/मोटार सायकल/स्कूटर/मोपेड शासनाकडे तारण ठेवली पाहिजे.

d) एकदा अग्रिम दिल्यानंतर त्यानंतरच्या पाच वर्षामधील काळात मोटार कार/मोटार सायकल/स्कूटर/मोपेड व अपंग राज्य शासकीय कर्मचा-यांसाठी स्वयंचलित तीन चाकी सायकल या प्रयोजनासाठी अग्रिम अनुज्ञेय राहणार नाही.

e) संबंधित अर्जदारास अग्रिम प्रदान करण्यात आल्यानंतर वाहन खरेदीबाबतचे तसेच वाहन गहाण ठेवण्याबाबतचे कागदपत्र एक महिन्याच्या कालावधीमध्ये शासनास सादर करणे आवश्यक आहे. संबंधित अर्जदारास अग्रीम मंजूरीच्या वेळी याबाबत आवश्यक सुचना

देण्यात याव्यात. अन्यथा सदर प्रकरणी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रीम-१०९५/प्र.क्र.७०/९५/विनियम, दिनाक २६ सप्टेंबर, १९९५ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

४. अर्जदाराच्या सेवानिवृत्तीचा दिनांक लक्षात घेऊन जर अर्जदार सदर अग्रिमास पात्र ठरत असेल, तर **अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार अनुदान उपलब्ध असेल तोपर्यंत** उपरोक्त अग्रिम धन मंजुरीचे आदेश काढण्यात यावेत. अन्यथा हे प्राधिकारपत्र मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १३३ च्या तरतूदीनुसार अग्राहय होईल.

५. अर्जदाराची एकूण अग्रिम वजाती त्याच्या वेतनाच्या ५० टक्केपेक्षा जास्त असता कामा नये.

६. अर्जदार खरेदी करणार असलेल्या मोटार वाहनाची किंमत प्रमाणित अग्रिमापेक्षा कमी असल्यास शिल्लक रक्कम शासनास ताबडतोब परत केली जाईल याची काळजी घ्यावी व त्याबाबत शासनास अवगत करण्यात यावे.

७. हा खर्च "मागणी क्र.जे-५-७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे-(योजनेतर/दत्तमत) २०२ (००) (०१) मोटार वाहने खरेदी अग्रीमे (लेखाशीर्ष संकेतांक ७६१० ०४८ १) या शीर्षाखाली २००९-२०१० या सालाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८. मोटार वाहने खरेदी अग्रिमाची वसुली ७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे २०२-मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा (७६१० ५०२ ४००) या जमाशीर्षाखाली जमा करावी व त्यावरील व्याज ००४९ व्याजाच्या जमा रकमा ८०० इतर जमा रकमा (००४९ ००६ १००) (४६) (२) मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा या जमाशीर्षाखाली जमा करावी.

९. हे अग्रिम धन मंजूर केलेल्या आपल्या कार्यालयाच्या आदेशाची प्रत शासनास त्वरीत पाठविण्यात यावी. तसेच प्रत्यक्ष कोषागारातून अग्रिम काढल्याचा दिनांक आणि त्यासंबंधीचा प्रमाणक क्रमांक ही शासनास कळविण्यात यावा. तसेच प्रमाणित केलेल्या रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित केलेली रक्कम त्वरीत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

१०. **नवीन मोटार सायकल** अग्रिम वसूली **६० समान मासिक हप्त्यांमध्ये व्याजासह,** तर **स्कूटर अग्रिम** वसूली **४८ समान मासिक हप्त्यांमध्ये व्याजासह** वसूल करण्यात यावी. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रिम १०९९/प्र.क्र.१६/९९/विनियम, दिनांक १०/३/२००० मधील परिच्छेद २(आ) (२) अनुसार नवीन **मोटार कार खरेदी** करण्यासाठी मंजूर करण्यात येणा-या अग्रिमाची वसूली करताना प्रथमतः **मुद्दलाची १०० समान मासिक हप्त्यात** वसूली करावी व त्यानंतर **व्याजाची वसूली ६० हप्त्यात** करावी.

**मात्र,** एखादा अधिकारी नियत वयोमानानुसार उपरोक्त मासिक हप्त्याचे १६० महिने पूर्ण होण्यापूर्वीच सेवानिवृत्त होणार असेल तर त्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसूली होईल, अशा प्रकारे वसूलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

तसेच परिच्छेद २(इ)(२) अनुसार **जुनी मोटार कार खरेदी** करण्यासाठी मंजूर करण्यात येणा-या अग्रिमाची वसूली करताना प्रथमतः **मुद्दलाची वसूली ५० समान मासिक हप्त्यात** करावी व त्यानंतर **व्याजाची वसूली ३० हप्त्यात** करावी. मात्र एखादा अधिकारी नियत वयोमानानुसार उपरोक्त मासिक हप्त्याचे ८० महिने पूर्ण होण्यापूर्वीच सेवानिवृत्त होणार असेल तर त्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसूली होईल, अशा प्रकारे वसूलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

११. आपणास कळविण्यात येते की, सदर अग्रिम अर्जदाराने त्याच कारणासाठी वापरल्याबाबतचे प्रमाणपत्र व खरेदीखताची प्रत आणि गहाणखताची प्रत या विभागास ताबडतोब पाठविण्यात यावी.

११. आपणास कळविण्यात येते की, सदर अग्रिम अर्जदाराने त्याच कारणासाठी वापरल्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागास ताबडतोब पाठविण्यात यावे. तसेच खरेदीखत आणि गहाणखताच्या प्रती संबंधित कर्मचारी/अधिकारी यांचेकडून प्राप्त करुन घेऊन कार्यालयाच्या अभिलेखामध्ये जतन करण्यात याव्यात.

१२ संबंधित अधिकारी आपल्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेलेला असल्यास, **अर्थसंकल्पिय वित्तीय प्रणालीवर Athorisation Slip काढण्यापूर्वी,** त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तदनंतर त्या अनुषंगाने, **प्रणालीवर प्राधिकृत करण्यात आलेल्या रकमेमध्ये शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच** देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी.

१३. जर काही कारणास्तव सदर अग्रिम मंजूर करण्यात येत नसेल अथवा नाकारण्यात येत असेल तर तसे या विभागास कळविण्यात यावे.

१४. आपल्या कार्यालयातील अर्जदारास त्याच्या नावासमोर दर्शविलेल्या रकमे इतकेच अग्रिम धन मंजूर करावे. निर्देशिलेल्या अर्जदाराव्यतिरिक्त दुस-या कोणत्याही अर्जदारास हे अग्रिम देय होणार नाही याची कृपया नोंद घ्यावी.

१५. संबंधित कार्यालयाने शिफारस केल्यानुसार शासकीय कर्मचा-यास अग्रिम प्रमाणित करण्यात आलेले आहे. तथापि, अर्जदाराचे **पाचव्या वेतनआयोगानुसार लागू असलेले मूळ वेतन** हे शासन निर्णय दि.२० जून, २००५ अनुसार विहित मर्यादेत आहे किंवा कसे याची खात्री केल्यानंतरच त्यास अग्रिम मंजूर करण्यात यावे.

१६. हे पत्र निधी उपलब्धतेचे प्रमाणपत्र आहे.

आपला,

(बा.कि.रासकर)
शासनाचे अवर सचिव

**प्रत-माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी :**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई ( २ प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर ( २ प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ औरंगाबाद/नागपूर,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, सिंधुदुर्ग, बुलढाणा, गडचिरोली, धुळे, जालना, नांदेड, लातूर, चंद्रपूर, कोल्हापूर, बीड, यवतमाळ, उस्मानाबाद, भंडारा, सोलापूर, नाशिक, परभणी,
जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग, बुलढाणा, गडचिरोली, धुळे, जालना, नांदेड, लातूर, चंद्रपूर, कोल्हापूर, बीड, यवतमाळ, उस्मानाबाद, भंडारा, सोलापूर, नाशिक, परभणी,
विधी व न्याय विभाग (कार्यासन २३ व २४),
वित्त विभाग (अर्थसंकल्प १०)
निवड नस्ती.

**शासन पत्र क्रमांक मोसाअ-१००९/(७)/(प्र.क्र.३९/०९)/पाच,**
**दिनांक २१ नोव्हेंबर, २००९ चे सहपत्र**

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.ए.बी. सावंत, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. सिंधुदुर्ग | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २ | श्री.एजाज अहमद बशीर अहमद शेख, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| ३ | श्री.एम.डी. राणाईत, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| ४ | श्री.पी.एस. ठाकरे, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. गडचिरोली | नवीन मोटार सायकल | ४०००० | मागणीनुसार |
| ५ | श्री.पी.बी. गिते, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. गडचिरोली | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| ६ | श्री.के.आर. कसबे, लिपिक | प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ,औरंगाबाद | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ७ | श्री.एस.झेड. वारुडे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. धुळे | नवीन मोटार सायकल | ४१४०० | मूळ वेतनानुसार |
| ८ | श्री.पी.आर. पांडे, लघुलेखक | जि.व स.न्या. धुळे | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ९ | श्री.आर.एस. पाटील, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. धुळे | नवीन मोटार सायकल | ४२३०० | मूळ वेतनानुसार |
| १० | श्री.डी.एस. शेलगावकर, अधीक्षक | जि.व स.न्या. जालना | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ११ | श्री.जी.पी. ढवळे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. जालना | नवीन मोटार सायकल | ४३२०० | मूळ वेतनानुसार |
| १२ | श्री.एच.एम. भोळे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन स्कूटी पेप प्लस | २८००० | नियमानुसार |
| १३ | श्री.डी.एल. कार्लेकर, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ३८७०० | मागणीनुसार |

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १४ | श्री.ए.एम. चटलावार, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नांदेड | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| १५ | श्री.ए.आर. पाठक, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. लातूर | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| १६ | श्री.एस.ए. परसुटकर, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. चंद्रपूर | नवीन मोटार सायकल | ४०००० | मागणीनुसार |
| १७ | श्री.के.आर. खनके, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. चंद्रपूर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| १८ | श्री.शौकत आनाउल्ला मुल्लाणी, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. कोल्हापूर | नवीन मोटार सायकल | ४१३२० | कोटेशननुसार |
| १९ | श्री.बी.बी. सानप, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बीड | नवीन मोटार सायकल | ४३४६९ | कोटेशननुसार |
| २० | श्री.एम.आर. ताडे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. जालना | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २१ | श्री.बी.एच. राठोड, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. जालना | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २२ | श्री.के.पी. जांभुळकर, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. यवतमाळ | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| २३ | श्री.पी.पी. देवडीकर, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. उस्मानाबाद | नवीन मोटार सायकल | ४३२०० | मूळ वेतनानुसार |
| २४ | श्री.व्ही.के. लोंढे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. यवतमाळ | नवीन मोटार सायकल | ३८३५२ | मागणीनुसार |
| २५ | श्री.व्ही.जे. कोपकर, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. लातूर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| २६ | श्री.पी.जी. दुधपोळे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४२१४६ | कोटेशननुसार |
| २७ | श्री.आर.जी. ठाकूर, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. बुलढाणा | नवीन मोटार सायकल | ४१४०० | मूळ वेतनानुसार |
| २८ | श्री.एस.बी. क्षिरसागर, सहायक | प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, नागपूर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| २९ | श्री.डी.जे. परांजपे, सहायक | प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, नागपूर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३० | श्री.व्ही.जी. अणे, लिपिक | प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, नागपूर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३१ | श्री.आर.पी. वाघमारे, लिपिक | प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, नागपूर | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ३२ | श्री.एस.जी. कान्हे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. भंडारा | नवीन मोटार सायकल | ४०६०० | मागणीनुसार |
| ३३ | श्री.डी.आर. भुरे, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. भंडारा | नवीन मोटार सायकल | ४४००० | मागणीनुसार |
| ३४ | श्री.एम.बी. शेळवणे, अधीक्षक | जि.व स.न्या. सोलापूर | नवीन मोटार सायकल | ४२००० | मागणीनुसार |
| ३५ | श्री.व्ही.व्ही. काटेवाल, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. सोलापूर | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| ३६ | श्री.पी.आर. मंडाळे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. उस्मानाबाद | नवीन मोटार सायकल | ४३२०० | मूळ वेतनानुसार |
| ३७ | श्री.व्ही.एस. मेहूणकर, लघुलेखक | प्रबंधक, उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ,औरंगाबाद | नवीन स्कूटी पेप प्लस | २८००० | नियमानुसार |
| ३८ | श्री.व्ही.बी. आहेर, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नाशिक | नवीन मोटार सायकल | ४२३०० | मूळ वेतनानुसार |
| ३९ | श्रीमती एन.आर. गणोरे, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नाशिक | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ४० | श्री.डी.जे. आडबोले, लघुलेखक | जि.व स.न्या. नाशिक | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ४१ | श्री.व्ही.जी. सोनार, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नाशिक | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ४२ | श्रीमती व्ही.एस. भावसार, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नाशिक | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |
| ४३ | श्री.एस.एम. सोनार, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नाशिक | नवीन मोटार सायकल | ४५००० | नियमानुसार |

| अ. क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| ४४ | श्री.एस.एम. काळे, कनिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. नाशिक | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| ४५ | श्री.व्ही.आर. वाघमारे, वाहन चालक | जि.व स.न्या. नाशिक | नवीन मोटार सायकल | ३४८७८ | मूळ वेतनानुसार |
| ४६ | श्री.ए.एम. पाटील, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. परभणी | नवीन मोटार सायकल | ४३७६८ | कोटेशननुसार |
| ४७ | श्री.एम.बी. सहजराव, वरिष्ठ लिपिक | जि.व स.न्या. परभणी | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| ४८ | श्री.एल.एन. दिटी, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. परभणी | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| ४९ | श्री.पी.जे. आंदोले, सहायक अधीक्षक | जि.व स.न्या. परभणी | नवीन स्कूटी प्लेजर | २८००० | नियमानुसार |
| ५० | श्रीमती एन.बी. भारद्वाज, अधीक्षक | जि.व स.न्या. भंडारा | नवीन मोटार सायकल | ४०८७५ | मागणीनुसार |
| ५१ | श्री.एस.ए. बोबडे, मा.न्यायाधीश | प्रबंधक, उच्च न्यायालय (मू.शा.), मुंबई | नवीन मोटार कार | १३०००० | मागणीनुसार |
| | | | **एकूण रुपये** | **२१०३१०८** | |
| **(एकूण रुपये एकवीस लाख तीन हजार एकशे आठ फक्त)** | | | | | |

**(बा.कि.रासकर)**
**शासनाचे अवर सचिव**

**<u>ता.क.</u>** : संबंधित कार्यालयाने शिफारस केल्यानुसार शासकीय कर्मचा-यास अग्रिम प्रमाणित करण्यात आलेले आहे. तथापि, अर्जदाराचे **पाचव्या वेतनआयोगानुसार लागू असलेले मूळ वेतन** हे शासन निर्णय दि.२० जून, २००५ अनुसार विहित मर्यादेत आहे किंवा कसे याची खात्री केल्यानंतरच त्यास अग्रिम मंजूर करण्यात यावे.